साकीनाका पोलिस स्टेशन, मुंबई येथील गु.र.क्र. ७३३/२०१८ या प्रकरणी मा. सत्र न्यायालय, मुंबई व मा. उच्च न्यायालय, मुंबई येथे विशेष सरकारी अभियोक्ता म्हणून शासनाची बाजू मांडण्यासाठी नियुक्त करण्यात आलेल्या ॲड. श्री. अजय एस. मिसर यांना व्यावसायिक फी मंजूर करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**

**गृह विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः एसपीपी-०२१९/प्र.क्र.६७ /पोल-१०**

२ रा मजला, मंत्रालय, हुतात्मा राजुगुरु चौक

मादाम कामा रोड, मुंबई-४०० ०३२.

दिनांक : १५ नोव्हेबर, २०१९

**संदर्भ : शासन अधिसूचना, विधी व न्याय विभाग क्र. एसपीपी ०२१९/यु.ओ.आर.१३/डी-१४, दिनांक १८ जुलै, २०१९.**

**प्रस्तावना :**

साकीनाका पोलिस स्टेशन, मुंबई येथील ग.र.क्र.७३३/२०१८ या प्रकरणी मा. सत्र न्यायालय, मुंबई व मा. उच्च न्यायालय, मुंबई येथे विशेष सरकारी अभियोक्ता म्हणून न्यायालयीन कामकाज पाहण्यासाठी विधी व न्याय विभागाच्या उपरोक्त संदर्भातील अधिसूचनेद्वारे ॲड. श्री. अजय एस. मिसर यांची यांची विशेष सरकारी अभियोक्ता म्हणून नियुक्ती करण्यात आली आहे. ॲड. श्री अजय एस. मिसर यांना व्यावसायिक फी अदा करण्याची बाब शासन विचाराधीन होती.

## शासन निर्णय :-

ॲड. श्री. अजय एस. मिसर यांना साकीनाका पोलिस स्टेशन, मुंबई येथील गु.र.क्र. ७३३/२०१८ या प्रकरणी मा. सत्र न्यायालय, मुंबई व मा. उच्च न्यायालय, मुंबई येथे विशेष सरकारी अभियोक्ता म्हणून न्यायालयीन कामकाज पाहण्यासाठी प्रतिदिन परिणामकारक सुनावणी करीता व्यावसायिक फी अदा करण्याच्या प्रस्तावास विधी व न्याय विभागाने तसेच वित्त विभागाने मंजूरी दिली आहे. त्यानुसार ॲड. श्री. अजय एस. मिसर यांना साकीनाका पोलिस स्टेशन, मुंबई येथील गु.र.क्र.७३३/२०१८ या न्यायालयीन प्रकरणात खालील प्रमाणे फी अदा करण्यास या शासन निर्णयान्वये शासन मान्यता देण्यात येत आहे.

प्रतिदिन परिणामकारक सुनावणी फी रु. २०,०००/-

२. प्रस्तुत प्रकरणी ॲड. अजय एस मिसर यांना अपरिणामकारक सुनावणी फी अथवा इतर कोणतेही फी/भत्ते अनुज्ञये असणार नाहीत. परिणामकरक सुनावणीचे दिवस संबंधित प्रकरणाच्या पर्यवेक्षीय पोलीस उपायुक्त दर्जाहून कमी नाही, अशा अधिका-याकडून प्रमाणित करुन घेण्यात यावेत व या प्रकरणी कोणत्याही प्रकारचे अतिरिक्त प्रदान होणार नाही, याबाबत संबंधित संवितरण अधिकारी यांनी दक्षता घ्यावी.

३. या बाबीकरीता येणारा खर्च या विभागाच्या मागणी क्र.बी-१, २०५५ पोलीस - (००) १०८, राज्य मुख्यालय पोलीस (०२) (०१) जिल्हा पोलीस दल - (२०५५ ००९७) - २८ व्यावसायिक सेवा या लेखाशीर्षाखालील त्या त्या आर्थिक वर्षाच्या मंजूर अनुदानातून व मासिक निधी विवरणपत्रानुसार भागविण्यात येईल.

४. हा शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.३०९/१९/व्यय-७, दि. ११.०९.२०१९ अन्वये मिळालेल्या सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१९१११५१६५०३५५६२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Neelam Girish Sangwai

Digitally signed by Neelam Girish Sangwai
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Home Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=a9bbc429d62201a67249f70e60acdfadbff901fbbbf45cc393dbd6aa91fbd6ca, serialNumber=81e4e52421d72a2ae32df6c7d06abb4e6a7b5820c3a929f328ad6c0dca4f38c7, cn=Neelam Girish Sangwai
Date: 2019.11.15 16:53:49 +05'30'

**( नीलम संगवई )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत:-**

१. पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
२. पोलीस आयुक्त,मुंबई.
३. वरिष्ठ पोलिस निरिक्षक, गुन्हे प्रकटीकरण शाखा, गुन्हे अन्वेषण विभाग, कक्ष -१०, मुंबई
४. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता / लेखा परीक्षा) महाराष्ट्र १ , मुंबई .
५. अधिदान व लेखाधिकारी, मुंबई.
६. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
७. ॲड. श्री. अजय मिसर, चेंबर नं.२१७/१, मारुती चेंबर्स, जिल्हा न्यायालय आवार, नाशिक - ४२२ ००२. फोन - ०२५३-२३११९३७ , मो.९८२३१५१९३७
८. विधी व न्याय विभाग (अे-ब्रँच), मंत्रालय, मुंबई.
९. वित्त विभाग (व्यय- ७), मंत्रालय, मुंबई.
१०. निवड नस्ती (पोल-१०).